**उतावळी मध्यम प्रकल्प, ता.मेहकर, जि.बुलढाणा प्रकल्पातंर्गत धरणाच्या आगमन व पुच्छ कालवा खोदकाम मार्गात चेकवॉल बांधणेच्या कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१९/ (प्र.क्र.३०९/२०१९)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १२ जून, २०२३

वाचा:-

१. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर यांचे पत्र.जा.क्र ७८९२/ विपाविम- / कातां ३ (२) / उतावळी प्रकल्प / विस्तार व सुधारणा दि. ४/११/२०२२.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

उतावळी मध्यम़ प्रकल्प़ हा उतावळी व लेंडी नदीवर मेहकर पासुन ४० कि.मी. अंतरावर असलेल्या देऊळगांव साकर्शा ता.मेहकर, जि.बुलढाणा या गावाच्या उर्ध्व बाजुस बांधण्यात आलेला आहे. उतावळी प्रकल्पाचे बांधकाम सन १९९९ मध्ये हाती घेण्यात आले होते.सन २००५ मध्ये प्रकल्प़ पुर्णत्वास आला असून सन २००६ पासुन प्रकल्पावरुन सिंचन करण्यात येत आहे.

उतावळी प्रकल्पाची माती धरणाची लांबी लेंडी व उतावळी नदीवर १७२१ मी. असुन महत्तम़ उंची २६.०० मी आहे.व चक्राकार सांडव्याची लांबी ३४५.१० मीटर आहे. प्रकल्पाच्या उजव्या मुख्य़ कालव्याची लांबी १७.५१ मी. असुन प्रकल्पाची एकुण सिंचन क्षमता ५३९४ हे. आहे. सदर प्रकल्पाव्दारे मेहकर तालुक्यातील देऊळगांव, साकर्शा व अकोला जिल्हयाच्या पातुर तालुक्यातील राहेर, पिंपळखुटा, मळसुर ,हिवरा, उमरा पांगरा,चान्नी , चांगेफळ , चतारी, खेट्री, सांगोळा व सस्ती या गांवाना सिंचनाचा फायदा होतो. उतावळी धरणाच्या आगमन व पुच्छमार्गातील सा.क्र. ०.०० मी वरील चेकवॉलचे बांधकाम करणे धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने महत्वाचे असून त्यामूळे भविष्यात होणाऱ्या संभाव्य धोक्यापासुन बचाव होवु शकतो.या पार्श्वभूमीवर उतावळी मध्यम प्रकल्प,ता.मेहकर,जि.बुलढाणा या प्रकल्पाच्या विशेष दुरूस्ती अंतर्गतच्या कामांच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर अंतर्गत उतावळी मध्यम प्रकल्प,ता.मेहकर,जि.बुलढाणा या प्रकल्पाच्या धरण दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत रू. १,५१,७५,८५८ (रू. एक कोटी एकावन्न लक्ष पंचाहत्तर हजार आठशे अठठावन्न फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता, निविदा प्रक्रिया,कामाचे नियोजन व पुर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबीसाठी प्रचलित शासन निर्णय/ परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहील.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन,निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (११)(०१) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग) (कार्यक्रम) (४७०१ जे १५८) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ०४ सन २०२२-२३ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२१७२४४६२०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: CN = NAMITA GAURAV BASER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.06.12 17:25:28 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर

१७) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग , अमरावती
१८) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१९) अधीक्षक अभियंता , बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा
२०) कार्यकारी अभियंता, जिगांव उपसा सिंचन विभाग, खामगांव
२१) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१९/ (प्र.क्र.३०९/२०१९)/ सिंव्य (कामे),**

**दि. १२/०६/२०२३ चे सहपत्र**

| Sr.No. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 12350722 |
| 2 | Royalty | 107977 |
| 3 | १ % Insurance | 123507 |
| 4 | १८ % GST | 2223130 |
| 5 | 3 % Contingencies | 370522 |
| | **Total Rs.** | **1,51,75,858** |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: CN = NAMITA GAURAV BASER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.06.12 17:25:46 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**